।। श्री ।।

# निवेदन

नाथ सांप्रदायाची परंपरा फार प्राचीन असून नवनाथांप्रमाणेंच ज्ञाननाथहि या सांप्रदायांत येतात! हे विसरून चालणार नाही. नवनाथांनी अनेंक शिष्य करून सांप्रदायाचा प्रसार केला. नाथांनी योग आणि मोहिनी, या विद्यांबरोबरच अणिमादि अष्टसिद्धी अवगत करून त्यांच्या द्वारे लोककल्याण साधलें.

नवनाथांचे चरित्रवर्णन करणे हा या 'गोरक्ष किमयागिरी प्रवाह' ग्रंथाचा हेतू नाही. सविस्तर चरित्र मालू कवीने 'नवनाथ भक्तिसार' या ग्रंथात वर्णन केलेलें आहेच (धार्मिक प्रकाशन संस्था, मुंबई यांचा नवनाथ भक्तिसार ग्रंथ वाचावा) या ग्रंथापैकी, ज्या भागाचा विस्तार मालू कवीच्या नवनाथ भक्तिसार पोथीत आला आहे. त्या त्या ठिकाणी; या ग्रंथांत आम्ही अध्याय निदर्शक अंक छापलें आहेत.

उदाहरणार्थ - पान १४ ओवी ३६ च्या पुढे १ हा अंक आहे. त्याच पानावर ओवी ४१ च्या पुढे २ अंक आहे. पान ३२ वर ओवी २३७ च्या पुढे १८ अंक आहे. याप्रमाणें ''गोरक्ष किमयागिरी प्रवाह'' ग्रंथातील कथाभागांचा विस्तार ''नवनाथ भक्तिसार'' ग्रंथातील, त्या त्या अंकाप्रमाणें त्या त्या विशिष्ट अध्यायांत पहाण्यांस मिळेल. या ठिकाणी नाथलीला वर्णन करताना मंत्राची माहिती, वर्णबीज पद्धतीनें कौशल्यानें ओव्यांमध्येच गुंफली आहे. त्यामुळे हा मंत्ररूप ग्रंथ सिद्धग्रंथ झाला आहे.

फलश्रुतीमध्ये मात्र दोन दत्तमंत्र अगदी स्पष्टपणें सांगितलेलें आहेत.

नाथपंथीय महन्त सारखे देशभर भ्रमण करीत असतात, व प्रत्येक वर्षी श्रावण वद्य षष्टीच्या दिवशी मोठा मेळा भरत असतो. नेपाळमधील पशुपती नाथांसह एकंदर बारा ठिकाणी, प्रत्येकवर्षी, बारा वर्षांनी एकदा, याप्रमाणें मेळा भरतो. त्यावेळी अनेक महंत हजर राहून, पुढील मुदतीसाठी नवीन प्रमुखाची नेममूक करतात.

गोरक्ष टिल्ला, देवी - पाटन हेलपट्टण, वगैरे ठिकाणी मेळा भरतो. आपल्या महाराष्ट्रात शिराळे गावाजवळ शके १८९१ मध्ये मेळा भरला होता.

या ग्रंथातील फलश्रृतीमध्ये सांगितल्याप्रमाणे चांगला योग पाहून गुरुवारी रात्री ग्रंथ वाचण्यास आरंभ करावा, निश्चयाने पठण केल्यास, ग्रंथात सांगितलेलीं फले नक्कीच मिळतील; याची खात्री बाळगावी.

या ग्रंथातील सर्व मंत्रांचा खुलासा देणें शक्य नसले तरी, या ग्रंथात आलेल्या वाताकर्षण, स्पर्श-मंत्र, भैरव-मंत्र, विभक्तास्त्र, हनुमन्त-विद्या, बह्मास्त्र, लक्ष्मी-तंत्र कष्टोद्धरण, वगैरे विद्या व मंत्रांची साधना पुरश्चरण, नियम वगैरेसह सम्पूर्ण माहिती असलेला ''नवनाथ उपासना'' हा ग्रंथ आम्ही लवकरच प्रसिद्ध करीत आहोत.

मंत्रशास्त्राच्या माहितीबरोबरच योगशास्त्रातील कांही अद्‌भुत माहिती, सोपे परन्तु आश्चर्यकारक इन्द्रजाल प्रयोग, रसायनविद्या आणि सहज मिळू शकणाऱ्या औषधी प्रयोगांची माहिती व औषधी तोडगे, तसेच यापूर्वी फक्त दोन वेळाच प्रसिद्ध झालेली व अत्यंत दुर्मिळ असलेली पशुपक्षांच्या भाषा समजण्याची मूळ संस्कृत मंत्रासह सविस्तर माहिती; नवीन ''नवनाथ उपासना'' ग्रंथात छापणार आहोत.

हठयोग, गोरक्षा-पद्धती, योगबिंदू वगैरे नाथ पन्थीय इतर योगविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहेतच. योगशास्त्रात गति प्राप्त झालेल्यांनी त्यांचा उपयोग करावा.

याशिवाय स्नानानंतर रोज वाचण्यासाठी उपयोगी पडेल असे पाच मिनिटा-पेक्षाही कमी वेळात वाचून होईल, असे २५ ओव्यांचे ''श्रीनवनाथ नित्यपाठ'' नावाचे स्तोत्र या पुस्तकात दिले आहे. ज्यांना गोरक्ष किमयागिरी ग्रंथ संपूर्ण वाचण्याइतका वेळ नाही; अशा भक्तांनी स्नानानंतर फक्त पांच मिनीटे सवड काढून उपासना केल्यास कांही दिवसातच प्रचिती येईल.

# ग्रंथाच्या पारायणाची माहिती

मनात एखादी इच्छा धरुन निश्चयानें ग्रंथपठण केल्यास, मनोकामना खात्रीनें पूर्ण होते. पूर्वेकडे तोंड करून, एखाद्या मऊ वस्त्राच्या आसनावर बसून ग्रंथ पठण करावा. लाकडी पाट बसावयास घेऊं नये. घेतल्यास, पाटावर वस्त्र घालून त्यावर बसावे. समोर चौरंग किंवा पाट ठेवून, त्यावर ग्रंथ ठेवावा, व पूजा करून नित्य वाचन करावे. समोर किंवा उजव्या हाताला श्रीदत्तात्रेयाची तसबीर असावी तसबीर शक्य तर भिंतीस टांगावी जमिनीवर ठेवूं नये. ग्रंथात सांगितल्याप्रमाणे गुरुवारी आरंभ करून रोज रात्री एकदां संपूर्ण ग्रंथ वाचून आरती करावी. या ग्रंथाचा एक पाठ पूर्ण होण्यास अर्ध्या तासापेक्षाही कमी वेळ लागतो. तेवढी सवड काढून नित्य ग्रंथपठण करुन, नाथांचा प्रसाद भाविक जनांनी मिळवावा, हीच श्रीदत्तचरणी प्रार्थना.

या गोरक्ष किमयागिरी ग्रंथात आलेल्या मंत्रापैकी कांही महत्वाचे मंत्र खालीलप्रमाणें

१) महामृत्युंजय मंत्रः- ॐ हौम् ॐ जूं सः भूर्भुवः स्वः त्र्यंबकं यजामहे सुगन्धिम्पुष्टिवर्धनम्। उर्वारुक्मिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ।।

२) संतानप्राप्तीसाठी गोपालमंत्र :- ॐ श्रीं ऱ्हौं क्लीं ग्लौम् देवकीसुत गोविंद वासुदेव जगत्पते । देहि मे तनयं कृष्णा त्वामहं शरणं गतः ।।

३) उच्छिष्ट गणपति मंत्रः- ॐ हस्तिपिशाचि लिखे स्वाहा ।।

४) दत्तात्रेय मंत्रः- १ द्रां दत्तात्रेयाय नमः ।।

२ दिगम्बरा दिगम्बरा श्रीपादवल्लभ दिगम्बरा ।।

५) बाधानिवरक हनुमत् मन्त्र ।- ॐ ऱ्हां ऱ्ही ऱ्हूं सर्वदुष्टनिवारणाय स्वाहा ।।

६) सरस्वतीमन्त्र ।- ॐ ऐं ऱ्हीं धीं क्लीं सौं श्रीं सरस्वत्यै नमः ।।

या मंत्रांची व इतरही बऱ्याच मंत्रांची संपूर्ण माहिती आम्ही ''श्रीनवनाथ उपासना'' ग्रंथांत देत आहोत. जिज्ञासूनी त्या ग्रंथांचे मार्गदर्शन घ्यावे.

संपादक-

।। श्रीआदिनाथाय नमः ।।

ॐ अस्य श्रीगोरक्ष ग्रंथस्य भगवान आदिनाथ ऋषिः
षडाक्षरी छन्दः नवनाथानुग्रह प्राप्त्यर्थे विनियोगः ।।

श्रीगणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः ।। श्रीपांडुरंगाय नमः ।।
श्रीलक्ष्म्यै नमः ।। ॐ द्रां दत्तात्रेयाय नमः।।

।। श्री रसेश्वरी प्रसन्न ।।

## १ वंदना

।। पंढरीसी वंदू । गाभा पांडुरंग । आत्मा किमयेचा । हेंचि सारू ।।१।।
।। वंदू आद्यानाथा । तैसा श्रीगणेशू । कवींचा कवीशू । मोहो-ज्वालू।।२।।
।। देवी सरस्वती । माया रसेश्वरी । विराजे ऐश्वर्यी । अम्बा माता।।३।।
।। दत्तात्रेयो गुरु । थोरू अवधूतू । पाय सदा धूतू । वंदू नाथू ।।४।।
।। गोरक्षू वंदूनी । गात्रें संयमुनी । किम या काव्यी वोपू । पांडुरंगी ।।५।।
।। काव्यी ध्वनी सुचे। आत्मा तो काव्याचा। ध्वनी रसू व्यापी। विश्वी आत्मा।।६।।
।। 'गोरक्षू किमया-। गिरी' प्रवाहो हा । 'नाथ-लीलामृत'। नाम ठेवू ।।७।।
।। मालूजींची वाटू । पुसू शोधू; हाती । किमयाहि लाहू । मंत्री जपू ।।८।।
।। संशयो सारोनि । दूरी तो धरोनि । भावू मनी पूर्ण । पांडु-नाथू ।।९।।
।। गौडी बंगालीये । भाषांची किमया । मराठी सुवर्ण । शिणगारू ।।१०।।

# २ कथा - सूत्र (समंत्रक)

।। माधवें यादवें । देव आत्म-काली । सभा पाचारिली । द्वारावती ।।११।।
।। अक्रूरे उध्दवो । नऊ नारायणू । सर्वा आवाहनू । वावो झाला ।।१२।।
।। केशवो बोलला। 'कवे? नारायणा?। अवतारी करुणा। पृथ्वी-पाठी।।१३।।
।। 'नारायण! कवे! । नारायण हरे! । नभ! नारायण! । नारायणा ।।१४।।
।। पिप्पल आयनू । आविहोत्रू तुम्ही । दुमील चमसू । करभाजनू ।।१५।।
।। नऊ नारायणी । नर-रूपें यावें । नऊ नाथू व्हावें । किमयागिरी ।।१६।।
।। व्यासां वाल्मीकीनो। शुकादिकी मुनें । मंत्रू गानी इये। नारायणी ।।१७।।
।। किमया रंजवो। नरू तो करावो । नारायणू-माया । किं-नु मया! ।।१८।।

卐 卐 卐 卐

## ३ अवतरण

।। मच्छिंदरू कवि । हरि नारायणू । नमूं जालंधरू । नारायणू ।।१९।।
।। कानीफा तो नरू । चर्पटी पांचवा । षष्ठु नागनाथ । भर्तरी की ।।२०।।
।। रेवणू अष्टमा । नवमा गहीनी । नाथां जपू नऊ । नारायणू ।।२१।।
।। नाथू पृथीवीसी। बीजें रूपें त्यासी। फेकी वीर्यू विधी । तयें ठायी ।।२२।।
।। जडा साऱ्या जाति । विना जीवा जाणा । अन्तरी तो भरे । पुर्णूकामू।।२३।।

卐 卐 卐 卐

## ४ मच्छिंदर अवतार

।। शिवानीसीं मंत्रू । संजीवनी देतां । उकलितां नाथें । जीवां व्यापी ।।२४।।
।। मच्छली जी नारी । यमुनेच्या तीरी । पुत्र-लाभें नीरी । मंत्रे घेई ।।।२५।।

।। कामीक धीवरू । शारद्वता मायू । कवि नारायणू । पुत्रू तयां ।।२६।।
।। मच्छिंद्र नामें । संबोखिती बाळा । विद्या मीन-धातू । तातू देई ।।२७।।
।। पुत्राते नावडे । जाइ काशीपुरी । केदारासी सोई । तेथोनिया ।।२८।।
।। शिवा दत्ता नाथा । तपें तोषोनियां । शस्त्रास्त्रे विद्यया । पूर्णू होतू।।२९।।
।। कर्णीमंत्रू स्फुटू । संचारू करी तू । राजताती कानी । कुंडले ती ।।३०।।
।। ऊर्ध्व-वातू सेवी । भास्करी नेत्रासी । एकाग्रे तापसी । सेवी पंथू ।।३१।।

## ५ माया मच्छिंदर

।। जारणें मारणें । शापू निवारणें । देवा मोहवीणें । कानी स्फूटू ।।३२।।
।। सप्तशृन्गी येई । अम्बा दर्शनार्थी । शाबरी मंत्रूनी । मनी पूजी ।।३३।।
।। मार्तंडा नागासी । येतां सिध्द देव । अष्टसिध्दी देत । बाळंगोनि ।।३४।।

।। अज्ञानें नाशोनी । ग्रंथ बोधवोनी । शाबरी निर्मूनी । पंथें चाली ।।३५।।

।। गोरक्षें तें ग्रंथी। गौडी बंगालीये। रचीयेलें स्वयें । किमया तत्वू ।।३६।।१

।। मच्छिंद्रो पोचतां । बंगाली गौडीसी । चंद्रगिरी ग्रामी। भिक्षेप्रती ।।३७।।

।। नेमें धर्म पाळू । सर्वोपदयाळू । अलखो आंगणी । शद्ब देई ।।३८।।

।। पुत्र-हींनु कांता। देखे तो जाणता । 'पुत्र माते द्यावा'। कांता मागे।।३९।।

।। चीमूटी भस्माची 'भक्षी ह्मणे योगी। भोगू जधीं सरे। तदा लाभू ।।४०।।

।। शेजारिणी नारी । बुद्धि-भेद-कारी। चिमूटी उत्कीरी। गोष्ठी फकी ।।४१।।२

卐 卐 卐 卐

## ६ सामर्थ्य परीस

।। जगन्नाथीं पूरी । पुढें सेतुबंधीं । हनूमंतु दूत । देखीयेला ।।४२।।

।। मर्कटा ह्मणोनी । हेटाळींतां जती । मच्छिंदर बानी । आत्म-प्रौढी ।।४३।।

।। वायुसूत-जती । वाग्युध्दें ताडनें । झोंबी हातघाई। संचरीती ।।४४।।

।। वात पर्वतास्त्रे । हनूमंत बळी । मौळी मच्छिंदरें । शीपावीला ।।४५।।
।। दुर्गा तळी दाबी। धरी मारुतीसी । अनीळ तातासी । 'धांवे म्हणें ।।४६।।
।। पुत्रार्थ अनीळू। रसा वाहीला । 'जती-श्रेष्ठ तूची । सोडी बाळू ।।४७।।
।। परखी परीसू । लोहा सुर्वणातें । चोज किमयेचें । तज्ञ घेती ।।४८।।
।। वायु-सूतू याची। 'जती! कार्य करी। स्त्रियांचिया राज्यी। जावोनियां ।।४९।।
।। मार्गी ज्वालामुखी । हिंगळा-इंगळा । मच्छिंद्रा कमळा। जाळू पाहे ।।५०।।
।। आठीहि भैरवी । गदारोळ केला । युध्दा आव्हानिला । जतींद्र तो ।।५१।।
।। भैरवी शस्त्रास्त्रे। ब्रह्मास्त्रे तयांची । चिमूटी भस्माची। बुंथी केली ।।५२।।
।। चामुंडांचा भारू । चंड पुढें आला । मोहूनी वाराली । योगीयानें ।।५३।।
।। हिंगळा तोषली । वरू देती झाली । समाधानें शांत। शीतला ती ।।५४।।
।। वायु योगें पंथू। वारा मल्हारांसी । अम्बा प्रसादेंसी । चाले वेगी ।।५५।।
।। वेत्रालें वेताळें। भूतें जीं उदेलीं। स्पर्शास्त्रे तीं स्थानीं । खिळवीलीं ।।५६।।
।। आडूळीं कुडाळीं। कोकणी तै येतां। काळीका देवता । आराधीली ।।५७।।

।। 'मंत्र काव्य' गाई। 'मंत्र नारायणी। कालिके वेताळा!। मान्य करा ।।५८।।

।। पोटी उभयांच्या। मोठा क्रोधू आला। 'शाबरी हा बेटा। कानी फांटा ।।५९।।

।। 'शाबरी काव्यांते। नादरीले कोणी?। जाळोनी शापोनी भस्म करूं ।।६०।।

।। दोघेही म्हणती । तोचि भस्म तेथें । सांचतें चिमूटी । अंगोपांगी ।।६१।।

।। रुद्र, शिव, सूर्य। साह्यासी धांवती। उभया रक्षीती। स्मित-हास्ये ।।६२।।

।। 'मच्छिंद्रा शाबरी। काव्यीं श्रेष्ठ मानूं। 'श्रद्धायु सेवूत । ज्ञान सारें' ।।६३।।

।। विश्वे देवी श्रद्धा। गुरु-क्षेत्री तैसी। मंत्रीहि आपैसी । जडों द्यावी ।।६४।।

।। ध्यावा ध्यानी, काव्यीं। धर्म नीति न्यायू। उदात्त विचारा। मनी ठायू।।६५।।

।। अनुभव-ज्ञानी । बाल ना शाबरी । संचारी मार्गाने । सत्य-ज्ञानू ।।६६।।

।। भस्मू माया भासे । करी जो सहनू । तपनू रक्षणू । देहें मनें ।।६७।।

।। क्रोधा आवरोनी । गात्रें संयमूनी । योगी तो कुशली ।लीन ज्ञानी ।।६८।।

।। देवां कालीसह। आराधीतो यती। काली वरू देती । कालांती ती ।।६९।।

।। ओगरोनी सेवा। देवां, नाथा, पांथा,। विश्वे देवां ताता। बोळविलें ।।७०।।६

।। तदा गदा-तीर्थू । मच्छिंदर क्रमी । वीरभद्रा अढी । पडे त्यासी ।।७१।।
।। राममंत्रे भस्मु । चिमूट फेकीतां । रुद्राक्षें झोडली । वीरभद्रें ।।७२।।
।। काळास्त्र काळोखी । वीरभद्र योजी। वासनीक योजी । मच्छिंदरू ।।७३।।
।। देखे युद्धकला । तोखे वीरभद्रु । आशिर्वादू देई । मच्छिंदरा ।।७४।।
।। येरीहि देवांनी । आसना विमानी । मनकर्णी स्थानी । पोचविला ।।७५।।
।। नऊ नारायणी । समाधि देखिल्या । स्थितप्रज्ञी कृष्णा। तेथें दहा ।।७६।।
।। सत्य लोक यात्रा । कैलास मानसू । वैकुंठ-साहसू । देवां संगे ।।७७।।
।। भोगावती तीरी । वज्रावती अम्बा । रामें दाशरथी । स्थापीजेली ।।७८।।
।। यात्रा द्वारावतू । क्रमोनियां येई । अयोध्या नगरी । राज-योगी ।।७९।।
।। पाशुपती राव । पाळी प्रजाजनू । राम दर्शनासी । रथी निघे ।।८०।।
।। मूर्त मंदिरांत । धूर्त द्वारपाळ । राव अम्बारीत । सैन्यामाजी ।।८१।।
।। मच्छिंदरी तोचि । हेतू होता साचा । राम दर्शनाचा । मूर्त जरी ।।८२।।
।। सन्मानें राजाशी । द्वारपाळू नेई । कान-फांटा जोगी । आडवीला ।।८३।।

।। मच्छिंद्रे शासीला । पाशुपतरायू । सेवका मलीदा । दंडू राया ।।८४।।

।। रावें रामपदीं । ललाट टेकीतां । स्पर्शास्त्र प्रेरीलें । जोगड्यानें ।।८५।।

।। पाशुपत-भाल । पदीं टेकीयेलें । तेथें चिकटले । भूमी भागी ।।८६।।

।। मंत्री पंडितींहि । जधी शोधू केला । मच्छिंद्र-प्रभावू । भावियेला ।।८७।।

।। कारुण्यें शरणू । जातां जोगियाते । विभक्त-मंत्रातें । जपीयलें ।।८८।।

।। सूर्यासी जिंकोनी । मच्छिंदरे त्वरें । रामासि प्रार्थीले । दीन वाचे ।।८९।।

।। 'रामा धांवा वेगें । नामें उच्चारीतां । उद्धरणा करी । जपी-योगी ।।९०।।

।। वरू देवोनियां । मंत्रा शाबरासी । मच्छिंद्रा भक्ताचें ब्रीदू रक्षीं' ।।९१।।

।। प्रसादू लाहोनी । मान्यता मंत्रासी । रामें देतां जोगी । उल्हासला ।।९२।।

卐 卐 卐 卐

## ७ गोरक्ष दर्शन

।। अयोध्या, मथुरा। उज्जयिनी सारी। यात्राहि काश्मीरी । पूर्ण केली ।।९३।।
।। दयाळ ग्रामासी । वेगी परतला । समाचारा गेला । चंद्रगिरी ।।९४।।
।। द्वादश वर्षान्ती। अंगणी ठाकला। 'बाळू कोठें बोला। भस्मींचा तो ।।९५।।
।। आर्या सरस्वती। भार्या दयाळाची । स्मरे उत्कीर्गी ते । भस्म गेलें ।।९६।।
।। नाथें हांक-भाकें। गोरक्ष उदेला। पायीं मच्छिंद्राच्या। स्वये रीघ ।।९७।।
।। सुंदरू तें ध्यानू । बारा वरूषांचे । जटा भुरुभुरु । नील नेत्रा ।।९८।।
।। गोजीरे तें मुखूं । सानुलीं पाउलें । उभें नेटुकें तें । गुरु-प्रिय ।।९९।।
।। येथूनियां आतां। जगन्नाथा जाऊ। कथा करू बाळा। कनक-ग्रामी।।१००।।
।। गुरू पुढें प्रेरी । भिक्षान्न आणी तू । जेववी तापसी । उपवासी ।।१।।
।। डोळा उकलोनी । वडे आणीयेले । गुरुसी वाढीले । गुरु बोले ।।२।।
।। डोळां डोळा पाहू । हरे? नारायणा । मंत्रू मृत्युंजयू । जपीन मी ।।३।।
।। मंत्राचा उच्चारू । दशबार करी । गोरक्षासी नेत्रू । त्र्यंबकाचा ।।४।।
।। शाबरी जा मंत्रू । तत्रू त्यासी देई । संथा शस्त्रास्त्रींची । चालू ठेवी ।।५।।१

# ८ गहिनी जन्म

।। पृथ्वीवरी जन्मु । गहनु देखावा । ज्ञाता 'कर्दमी हा । खेळू ह्मणे ।।६।।
।। चिक्लीतू, कर्दमू। उत्कीरीहि जन्म। गर्भी जीवा स्थान। महा-भूतीं ।।७।।
।। गोरक्षी मानसी । चाले हा विचारू । मार्गामाजी मंत्रू । मृत्युंजयू ।।८।।
।। जपी, तपी, कर्मी। हीच संजीवनी। अहो! येतां जातां । बैसा उठा ।।९।।
।। खेळतां बाळासी । कर्दमू पुतळा । निर्मियेला तेणें । बाल-भावें ।।१०।।
।। मंत्र आंतरीं तो । प्रभावीत होई । टाहो ध्वनी होई । बालकाचा ।।११।।
।। गोरक्षु सुगंधू । जाणी मच्छिंदरू । शाबरी किमया । तीच गूढू ।।१२।।
।। माय आवाहिली। बाळासी वोपीले। आशीर्वाद दिले । सांभाळी हें ।।१३।।
।। करभंजा होई । नारायण जाणी । गहीनी नामांनी । संबोखी तू ।।१४।।
।। 'गोरक्षानुग्रहें । बाळु मान्य होई । 'धन्य माय तूही । तैशी होशी ।।१५।।
।। मधु-विप्रस्त्रीतें। बाळासी सोंपवी। 'गहिनी चिरंजीवो । होवो' म्हणे ।।१६।।
।। कीर्त चिरंजीवी । करील बालक । मोक्ष-सुख तूज । देवो बाल ।।१७।।
।। अमर तो जाणा । कीर्त जो दिगंती । सुगंधी पसरी । पुष्टि दाता ।।१८।।

## ९ मीननाथ दर्शन

।। गहीनीसी मागो। कनका या ग्रामी । ठेवोनियां स्वामी । गोरक्षजा ।।१९।।

।। करवी गोरक्षा । तप केदारासी । तेथें शिवपदी । वाहीयेला ।।२०।।

।। स्थानी स्थानी यात्रा । मच्छिंदरू चालला। रामेश्वरी आला। हनूमंतू ।।२१।।

।। पुराण तो योगी । मच्छिंद्रा सांगती । घेवोनीयां चाले । कामरूपा ।।२२।।

।। राज्य तेथें चाले। स्त्रिया कर्मी दंग। कोणी मैनाकीनी । राणी तेथें ।।२३।।

।। मच्छिंदरू राजा । अन्तःपुरी योगी । मैनाकिनी पोटी मीननाथू ।।२४।।

।। मीनू मच्छिंदरू । मूर्तू नारायणू । नाथ-पंथी राज्य । चालतसे ।।२५।।

।। हनूमंतू-कार्यी। मच्छिंदर योगी। भु-भुःकारे रक्षी । रामदूत ।।२६।।१०

## १० जालंदर दर्शन

।। जालंधर जन्मू। कथूं योगू आतां। ज्वाला-जाली जाई। काम राजा ।।२७।।

।। प्राचीना कथा ही। पुराणी जाणावी। शंकरासी काम। बाधा जधीं ।।२८।।

।। शिव चिंती मनीं। तृतीय नेत्रानें। ज्वाला माजी काम । राजा जाळू ।।२९।।

।। ज्वाला रूपें राही। मदन-मन्मथू । रती रूपें राही । ज्वाला माला ।।३०।।

।। स्वाहा स्वधा एकी। प्रकटती यज्ञी । युति तेजाळे ती । ज्योतिर्मति ।।३१।।

।। जातवेदो जाणा। ज्वालामाली शिवू । शक्ती प्रकटती । यज्ञी-कुंडी ।।३२।।

।। कवींची कीमया। ज्वालेसी चैतन्यू । कल्पोनी कवनी । ज्वालेंद्रातें ।।३३।।

।। पुत्र-पौत्र-ज्योति। स्वयेंचि जगती । कां या दर्पणासी । दुजा लागे ।।३४।।

।। हस्तिनापुरांतु । बृहद्रवा वंश । यज्ञ कुंडा आंतु । जालंधरू ।।३५।।

।। जन्मतां विरागी । गृह त्यागु करी । विवाह प्रसंगे । राही रानी ।।३६।।

।। भक्षितातीं ज्वाला । रानी सर्व प्राणी । रक्षितातीं पुत्रा । जालंधरा ।।३७।।

।। दत्त दर्शनाचा । रानी लाहो त्यासी। लावी तपाभ्यासीं। श्रेष्ठ-राजा ।।३८।।

।। संसारीहि तापु । तापु तेंवि रानी । तेणें जालंधरू । इंद्रा सम ।।३९।।

।। तत्रापि यात्रार्थी । येई भागीरथी । नमनार्थी येई । काशीपुरी ।।१४०।।

।। भिक्षा कोल्हापुरी । पांचांलयी जेवी । मातापुरी निद्रा । भ्रमतु तो ।।४१।।

।। दत्तात्रयें त्यासी । विद्या ज्ञानें कला । तैसी आराधना । कथीयेली ।।४२।।

।। शस्त्रास्त्रांची विद्या। नाट्य-गान-कला। अद्वैती प्रबोधू । जालंधरू ।।४३।।

।। बद्री केदारासी। तापसी आराधी । धुंडीता स्थानांसी । मौज दावी ।।४४।।

卐 卐 卐 卐

## ११ कानीफा

।। हिमराजी जेथें। स्थली स्थली देखें। नील कृष्ण कोठे। शुभ्र माथा ।।४५।।

।। धुंडी सुत मालू। कवी सांगताहे। त्यासी गज मानी । दिग्गज जो ।।४६।।

।। विवरी तयाच्या । बालार्क बालक । कानीफ तापसी । तपतसे ।।४७।।

।। वयें वर्षे सोळा। कैसा एथें आला?। विवरांत केवीं । तपी झाला ।।४८।।

।। त्यातें पुसोनियां । विद्या मंत्रे दानें । शिष्य तो सन्मान । संगें नेतू ।।४९।।
।। देवांसी पाचारी । मागे वरदानू । देव जालंधरा । वर-दाते ।।१५०।।
।। दान तैसे शिष्या । ऐसें प्रार्थीयेलें । देव नाराजले । युद्धार्थी ते ।।५१।।
।। हारीलें देवांसी । वस्त्रें हिरोनियां । दीन जालंधरें । देवें केले ।।५२।।
।। ज्वालेंद्रें मन्मथें । शाबरी कर्तृत्वें । कवित्व देवांतें । प्राशीयले ।।५३।।
।। त्रिवार तें मान्य । देवां जधी होई । वस्त्री आभरणी । पूजी देवां ।।५४।।१२

卐 卐 卐 卐

## १२ गोपीचंद मैनावती

।। बैसवोनी त्यासी । बद्रीकास्थानासी । 'रक्षी तपीयासी । केदारा तूं ।।५५।।
।। जालंधर म्हणे । यात्रा पंथी जाणे । नागाश्वत्थीं जाणें । तापवीत ।।५६।।

।। सूर्य कुंडाहूनी । हेलपट्टणासी । तृणयुक्त भारा । मिरवतू ।।५७।।
।। जालंधर चाले । भारा पै विभक्त । चालतां देखती । न - नारी ।।५८।।
।। हेलपट्टणासी । नाथू गोपीचंदू । माता मैनावती । नेत्र चंद ।।५९।।
।। नेत्रें माता देखे। माथां तृणभारू । अन्तराळी चाले । योगीयाच्या ।।१६०।।
।। स्पर्श माथां नाही। विभक्तु चाले तो। 'गुरु हाचि करूं। सेवूं यातें।।६१।।
।। जालंधर-सेवा । षण्मासें करीतां । शिष्यत्वातें देत । परीक्षुनी ।।६२।।
।। मांडी फोडूनीयां । भोंगा हा परीस।मैनावती लोह । सोनें झालें ।।६३।।
।। मुक्ती मृत्युपूर्वी । ज्ञाती मैनावती । तेंचि इच्छी माता । पुत्राप्रति ।।६४।।१३

卐 卐 卐 卐

## १३ जालंधर गर्ता

।। अत्तरे उटणें । स्नानें गोपीचंद । दासीं सखीं जनीं । सेवीजेला ।।६५।।
।। देखे देह सुख । मैनावती माता । हेलावते मुक्ता । अन्तरंगी ।।६६।।

।। सुख देही होय । लोहासम जाणी । गुरु परीसें तें । स्वर्ण-वर्णी ।।६७।।
।। देहो काष्ठ लोहो। गुरुची कीमया। मुक्त होतां माया। सुवर्ण तें ।।६८।।
।। देह-सुखा-माजी । रंग दंग होतां। नरू, नारायणू । कैसें होती? ।।६९।।
।। दुःखद विचारे । हेलावे हृदयी । अश्रू नेत्रांतूनी । ओघळती ।।१७०।।
।। उष्णों फोडू डोई । गोपीचंद-पृष्ठीं । अंगांगी उठती । राजयाच्या ।।७१।।
।। मातेपाशी रायू। घाई घाई जायू । 'माते कथीं, कायू । तूतें छळी ।।७२।।
।। 'दुःखाचें कारण । नीववीन अग्नु । 'अंतरी पोळले । शांतवीन ।।७३।।
।। म्हणे जंव रायू। माता त्यासी कथीं। 'देहाचे चोचले। मृत्यु जाणी ।।७४।।
।। अन्तरीची सोये। पाही बाळ! राया! । लाग वेगी येई । गुरूपाशी ।।७५।।
।। लुमावन्ता कांता। रोषें जी फणाणी । द्वेषें जालंधरा । जाळूं पाहे ।।७६।।
।। 'मैनावती माता । विवशी मावशी । घात पुत्रचा जी । करूं पाहे ।।७७।।
।। सांगे ती राजया। 'मागे मी अभया। मैना-जालंधरां। गाडीनू मी' ।।७८।।
।। प्रद्युना, मन्मथा । पंचानना स्वतां । ब्रह्मा आवरीतां । भागेजला ।।७९।।

।। गर्ती जालंधरा । देती वज्रदेही । अंतरी तो क्षेमू । राही सदा ।।१८०।।
।। ज्वालेंद्रातें गर्ता !। काय केलें कर्मी! मंथरा, कैकेयी। लाजविली!।।८१।।१४

卐 卐 卐 卐

## १४ गांठी भेटी (१) गोरक्ष - जालंधर

।। जालंधरा लोटी। गर्तेमाजी लुमा। गेला स्वामी दूरी। वार्ता केली ।।८२।।
।। कानीफा तीकडे । संचारासी जाई । गोरक्षु मच्छिंद्रा शोधीतसे ।।८३।।
।। हेलापट्टणासी । गोरक्षु येतसे । जन कथीतसे । दुजे नाम ।।८४।।
।। दुजा जालंधरु । ना तो मच्छिंदरू । येथें वास केला । दूरी गेला ।।८५।।
।। गोरक्षु भिक्षेसी । जातां घरोघरी । 'अलक्षु म्हणोनी'। निरंजन ।।८६।।
।। ध्यानातीत विश्व । विश्वंभरे तैसा । लक्ष्यापलीकडे । निरंजन ।।८७।।
।। अर्थ अलक्षाचा। नाथचि जाणती । उत्तरी आदेश । तेंचि देती ।।८८।।

।।अलक्षु संदेशु । देतु घरी एका । गर्ता केली जेथू । तेथूं येई ।।८९।।
।। गर्तेतूनी जंव । आदेशहि तंव । जालंधर म्हणे । 'कहीये जी' ।।१९०।।
।। आज्ञा महाराजा। आदेशार्थ ऐसा। पाळीन स्वयें मी। ऐकू दीजे ।।९१।।
।। जालंधर मुखें । जाणीजेली कथा । गोरक्षासी कोपु । उग्रु येई ।।९२।।
।। निववोनी तया। जालंधर म्हणे:। शोधी कानीफासी। कथी वार्ता ।।९३।।
।।'सोडवील मज। वांचवील राजा। 'युक्त तेचि काजा । जाणे तोचि' ।।९४।।
।। संचारू यात्रेसी। कानीफा चालला। स्त्रियांच्या राज्यासी । मर्यादेशी ।।९५।।
।। हनूमंत येतू । मर्यादिपर्यन्तू । भुभु:कारू देतू । युद्धार्थी तो ।।९६।।
।। कानीफा-मारुती । अस्त्रे परस्परी। प्रेरणी, वारीणी। झडवीती ।।९७।।
।। कानीफा भूमीसी । मारुतीसी पाडी । मारुत धांवतो । सहाय्यार्थी ।।९८।।
।। सायासी करूनी। उभयांसी सख्य । सांगे कानीफास । आदेश तो ।।९९।।
।। 'मच्छिंद्राते नको । नेऊं येथूनीयां। इतुकी त्वां सेवा। द्यावी आम्हां ।।२००।।
।। तैसी भाक देतां । मारुतु मारूती । सारे निवर्तती । देशोदेशी ।।२०१।।

।। मच्छिंद्रू भेटी । कानीफासी होता । प्रेमाची ल्हरी । हेलावली ।।२०२।।

।। पुढे जाण्या आज्ञा। मच्छिंद्रू देती। धनें कानीफातें। वोपीती ते ।।२०३।।१५

卐 卐 卐 卐

## १५ गांठी भेटी (२) गोरक्ष - कानीफा

।। पालखीसी भोई । सेवक चालती । हेलापट्टणासी । येती सारे ।।२०४।।

।। जगन्नाथाहूनी । गोरक्षुहि येती । उभयो भेटती । नाथु-पंथी ।।२०५।।

।। कानीफा प्रेरीती । विभक्तु मंत्राते । फले पक्व राशी । सांचतसे ।।२०६।।

।। प्रौढी देखोनीया । गोरक्षु ना साहे । थाटु मिरवी तो । अमृतांचे ।।२०७।।

।। सामर्थ्ये उभये । जेंवि दावियेले । मिठी परस्परे । होये क्षणी ।।२०८।।

।। वृतांते आदेशें । गोष्टी परस्परां । निश्चिती मार्गाची ।तैशी जाली ।।२०९।।

।। स्त्रियांच्या गांवासी । गोरक्षानें जावें । गोपीचंदाप्रती । कानीफानें ।।२१०।।

।। अपूर्व स्वागत । गोपीचंदे केलें । कानीफा तें नेलें । वाडीयांत ।।२११।।
।। शांत क्रोध करी । पाय चुरी हातें । सेवा कानीफाची । परोपरी ।।१२।।
।। मैनावती तैसी । सांभाळिते नीति । क्षमा; शांति, प्रीति । वरीतसे ।।१३।।
।। उभां शिष्यांतें। कानीफा आश्वासी। शांत चित्ते म्हणे। 'शुभ होय' ।।१४।। १६

卐 卐 卐 卐

## १६ जांलधर सुटका

।। कानीफासी राये । दाविंयेली गर्ता । अश्वांच्या उत्कीरी । जालंधरू।।१५।।
।। कल्याणार्थ तदा। कानीफा तो वदें। पांच मूर्ती करी । राजया! तूं ।।१६।।
।। 'हेम, रौप्य, ताम्र.। कांस्य, लोह, तेंवी। रचीं गर्तेवरी। एकू एकी ।।१७।।
।। गर्तेवरी धावू । गोपीचंद घाली । घात योजियेला । कोणें? वदा' ।।१८।।
।। जालंधर बोले । गोपीचंद सांगे । घावू घालतसे । लोह मूर्तु ।।१९।।

।। जालंधरे शापें । मूर्ती भस्मु होत । गर्ता उत्कीरीत । रावराणा ।।२२०।।
।। जालंधर नाथु । पाही गर्ते आंतु । कानीफा शरण । त्यासी जातु ।।२२१।।
।। शिष्यांतें आलिंगी । गुरुंसी वंदिती । गोपीचंदु तेवी । माता मैना ।।२२२।।

卐 卐 卐 卐

## १७ गोपीचंद तपस्या

।। राया!गोपीचंदा!। तपस्येसी जावे। भिक्षा-पात्र घ्यावे । संगे तुम्ही ।।२३।।
।। सांगे गुरुराजा। जालंधरा ओजा। 'अहंकार बोजा। झडो द्यावा ।।२४।।
।। लुमावती राणी । रडे दीनवाणी । तीसी समजावणी । होता पुरे ।।२५।।
।। मुक्तचंद्र-पुत्र । राज्यासनी येई । गोपीचंदु यात्रा । चाले पायी ।।२६।।

卐 卐 卐 卐

# १८ चंपावती भगिनी

।। कौला बंगाल्यासी। पौलापट्टणासी । शिष्या गोपीचंदा । प्रजा पाहे ।।२७।।

।। वार्ता राया गेही । चंपावती कानी । बंधूसी भगिनी । देखे स्वतां ।।२८।।

।। गोपीचंदा नामें । जालंधरा कर्मे । निंदिती ते वर्मे । काढोनियां ।।२९।।

।। पौली जो तिलकु- । चंदु नामें राया। चंपावति कांत । तोहि निंदी ।।३०।।

।। बंधूसी तै अन्नु । चंपा पाठवीते । सेवीतसे ब्रम्हू । जाणोनी तें ।।३१।।

।। निंदीती आप्तत्वें । चंपा राणीयेते । कटघारी घातु । स्वयें करी ।।३२।।

।। गोपीचंदु म्हणे । 'जालंधरा आणूं । 'भगिनीचा प्राणूं । देही घालूं' ।।३३।।

।। 'जालंधर गुरु । येतील तोंवरू । प्रेतातें सांवरू । भगिनीच्या ।।३४।।

।। ज्ञानी जालंधरु। धांवोनीया येती । गूरु-शिष्यां देखी । तिलकू तो ।।३५।।

।। धांवे पायांपाशी । पावे तात्कालीकीं । तपोराशीं जपे । मंत्रपंक्ती ।।३६।।

।। मृत्यंजय मंत्रे । संजीवन दिले । चंपा तिलकांसी । भेटवीले ।।३७।।

卐 卐 卐 卐

## १९ कलिंगा कलावती

।। केदारी तपासी । जातां गोपीचंद । स्त्रीराज्यीं सीमेसा। गोरक्षू तो ।।३८।।

।। तेची मार्गी तेथें। कलिंगा ती येई। नाट्यी गानी सिद्धा। कलावंती ।।३९।।

।। गोरक्षासी भेटे । गोरक्षु तियेसी । परस्परें मैत्री । जडों लागें ।।२४०।।

।। गोरक्षु पुसे तो। 'मज संगे न्याहो' । कलिंगा तै पुसे। 'कला ज्ञाता' ।।४१।।

।। 'नाट्यें गानें धनें' । विपुलें साधनें । 'मैनाकिनी दानें । करींतसें' ।।४२।।

।।गोरक्षु तो प्रार्थी।'मी तो परमार्थी।'नाट्यादि प्रसंगी।सेवूं जाणे।।४३।।

।। 'मज नसो वावो । पुरुष जातीसी । 'स्त्रीरूपू देवोनि। संगे न्यावें ।।४४।।

।। 'जाणसी कां ताल,। गीत, नृत्य,काल। आंदोल संगीत। आलापादि? ।।४५।।

।। विचारी कलिंगा । गोरक्षु-मलंगा । निसर्गु संगीतें । साग्रे दावी ।।४६।।

।।हातीं घेवोनियां । सारंगी मलंगू । सप्त स्वरें ध्वनी । छेडू लागे ।।४७।।

।। वृक्ष वेली गाती। वायु ताल देती। लोलु डोलु पुष्पें। मंदु नाट्यु ।।४८।।

।। गोरक्षाची शिष्या । होत कलावंती । मारुतीहि तोंचि । युद्धार्थीये ।।४९।।

।। अस्त्रातें वर्षोनी । युद्धिं गोरक्षानें । केला पराभूत । हनुमंत ।।२५०।।

।। 'रामा!लक्ष्मणा!। बाहे बिभीषणा। 'संरक्षका!राणा!। धांवा, ध्याहो ।।५१।।

।। राम राणा धांवे। लक्ष्मण साह्यासी। ताता तो मारुत। तैसा येई ।।५२।।

।। सख्यें त्या सर्वांनी। दिली सांधोनीयां। आपुलाल्या स्थानी। शीघ्र-गति।।५३।।

卐 卐 卐 卐

## २० माया-मुक्ति

।। सिंहलु द्वीपासी । कन्या कीलोतला । हासली वसूला । योगायोगे ।।५४।।

।। वसू-शापें तीसी । हेलापट्टणासी । स्त्रियांच्या राज्यासी । राज्ञी-मीषें।।५५।।

।। हत्तीणीने ईसी । अर्पीली मालीका । राज्यीं स्थापीयेली । सर्व जनी।।५६।।

।। ऐशी राणी होतां । हनुमंती सेवी । वरू तेणें तीतें । दुजा दीला ।।५७।।

।। 'मच्छिंदरू तूज । वरू-पुत्रु, मीना । 'देईल जाणून । सेवी त्यासी।।५८।।

।।गोरक्षु येतांचि।सावधू त्वां व्हावे।सांगाया हनुमंत। आतां धांवे।।५९।।
।। पराभूत होतां । गोरक्षाच्या हातीं । हनुमंत पुढे । सेवी कोठे ।।२६०।।
।। 'सावधानी शिष्यें । जाईल तो योगी । 'योगीयांच्या संगी । सावधान' ।।६१।।
।। हनुमंते ऐसें । खासें मैनाकीतें । राणी जी राज्यातें । निवेदिले ।।६२।।
।। पुढें सभास्थानी। राजे मैनाकीनी । मच्छिंदरु, मीनी । कलावंती ।।६३।।
।। ताफा तो कलिंगी । नाट्यें रंजवीत । मृदंगु नादत । गोरक्षाचा ।।६४।।
।। गोरक्षु तो आया। चालो मच्छिंदरु। 'नटवरु शंकरु। क्या है माया।।६५।।
।। चालो मच्छिंदरो। गोरक्षु है आया। तालबद्ध शब्दु। कानीं ध्वनी।।६६।।
।। सभेसि मृदंगु । निनाद ते माया । ठायीं मच्छिंदरु । गर्जतसे ।।६७।।
।। ऐकतांचि ताल । मच्छिंदर भाल। मुद्रा, नि कपोल । होई लाल ।।६८।।
।। मुरुदंगु-ध्वनी। मैनाकिनी कानी । मुद्रा तिची मानी । खिन्ना दिसे ।।६९।।
।। उभये ती पुसे । कलिंगेसी कैसे? । निजें जें मानसे । उदेलें तें ।।२७०।।
।। सांगे कलावंती। कां हो येणे केले?। कालिंगी-अंगुले। निर्देशीले।।७१।।

।। मृदंग्यासी दावी । गोरक्षु तै सेवी । निज रूपें भावें । मिळणी तै ।।७२।।

।। सर्वासी मिळणी । गुरु शिष्य धणी । अलिंगीती खाणी । स्वर्णवर्णी।।७३।।

।। भस्माची चिमूटी। गोरक्षु तै उठी । माया मच्छिंदरी । स्वर्ण सृष्टि ।।७४।।२०

卐 卐 卐 卐

## २१ शाप मुक्ता मैनाकिनी

।। विलासु योगीयां। हानी-पंथ नेई। प्राणियां सर्वाहि।योगी मुक्ति ।।७५।।

।। योग युक्तां जीवां।उद्योगानें मुक्ति। तयांची शक्ति ती। वाखाणीती ।।७६।।

।। जीवू वरकडू । बरडू जाणावे । दुःखी-स्वप्नी-दंगी । झुरती जे ।।७७।।

।। योगीयांनी व्हावे । निर्भयू, निष्कामू । क्रोधू, मोहू माया। निरसावे ।।७८।।

।। वैराग्ये पिचतू । मच्छिंदरु, मीनू । गोराक्षो लक्षूनी । उपदेशू ।।७९।।

।। मैनाकिने धनें । भोग दावीयेले । परी ना आतळे । राज-योगी ।।२८०।।

।। गोरक्षा सकळा। शापीती कमळा। नारी, शैल्य, बाळा,। सुवासिनी ।।८१।।

।। योगियां शापांचे । वरांचेही तेवी । भय वा आनंद । यथा तथा ।।८२।।

।। मच्छिंदरू, मीनू । गोरक्षाच्या सवें । गांवाचें बाहेरी । येते झाले ।।८३।।

।। मैनाकीनी धरी। पाय त्या साऱ्यांचे। दुःखे ठायी धायी। आक्रंदे ती ।।८४।।

।। पुत्रार्थी आत्मेया । कळवळे हृदी । मीननाथु 'आई' । हांक देता ।।८५।।

।। गाई समा माया । हंबरडा फोडी । नारी जन हाय । हाय करी ।।८६।।

।। आकाशांत वरी । नारायणू वसू । मोचना शापांती । देऊ, येई ।।८७।।

।। शाप-मुक्ता राणी । योगीमाया-मुक्त । भोगी कलावंत । आनंदो हा।।८८।।

।। हे चि कीं किमया। शाबरी सरिता। योग-छन्दु जाया। येथें वरु ।।८९।।२२

卐 卐 卐 卐

## २२ माया-योग

।। सिंहलीसी जाई । मुक्ता मैनाकीनी । बंगाल्यासी चाले मच्छिंदरु ।।२९०।।

।। मार्गीच तयांसी । भेटे कानीफा तो । तपस्वी बैसला । केदारासी ।।९१।।

।। ग्रामी जातां प्रेमी । गोरक्षु भेटत । जालंधरु वृत्त । कथी सारे ।।९२।।
।। हेलापट्टणासी । येतां मैना सती । भेटे स्वागतेंसी । जालंधरी ।।९३।।
।। तेथोनीयां क्रमू । जगन्नाथ धाम । येथें घडे वामु । कार्य देखा ।।९४।।
।। मीननाथें हात । पाय विष्ठावंत । गोरक्ष ते धूत । चर्म त्याचे ।।९५।।
।। कृत्य घोर करी। जीवे घेई बाळ । मच्छिंद्र आकांत । आक्रंदिला ।।९६।।
।। मीन-चर्म पाही । आवरेना ताता । गोरक्षाते दोषा । खूप कोपी ।।९७।।
।। बाळासी उठावूं । संजीवनी जप । गोरक्षहि तप । तेंवी सेवी ।।९८।।
।। मच्छिंदरू मीनू । मायावी जीवन । देखोनीयां लीनू । पायी होवूं ।।९९।।
।। माया मोहा संगे। संचारू जीवासी। योगीयांते जडे। माया योग ।।३००।।२३

卐 卐 卐 卐

## २३ गोरक्ष किमयागिरी

।। तेलंगणी येती । गोदा संगमांती । वाल्मीकीचे प्रांती। त्र्यांयती ।।३०१।।

।। रानी, वनी स्थानी। चोरां चिलटांनी। भये, मोहे, वनी। दीनें केली ।।३०२।।

।। गुरु शिष्य सर्वे । परीस कसोटी । परस्परी पोटी । लावितातीं ।।३०३।।

।। मच्छिंद्राचे गांठी । छाटी मैनाकीने । सोनीची विटू । ठेवींयेली ।।३०४।।

।। गोरक्षे लेईली । मच्छिंद्राची झोळी। गुरु-शिष्या झाली । परिक्षीतीं ।।३०५।।

।। कांखे घेई झोळी। स्कंधी मीनु बाळ। वाटे चोर पोळी। पीकूं आली।।३०६।।

।। सोनीयाची वीटू । वाटेसी टाकावी । परीक्षा परीसू । होईल तो ।।३०७।।

।। गुरुची करावी । पारख, मोहावा । वाण बाण व्हावा । सोनीयाचा।।३०८।।

।। टाकोनीयां वीट । भये घालवीलें । कांतारी लुटारू । तस्करांचे ।।३०९।।

।। गोरक्षाची घाई । पुढें धांवायाची । गुरु मागें राही । गांठू पाहे ।।३१०।।

।। म्हणे गुरु-राजा। 'वीटु पाहू देई'। 'पीछे डर गई' । शिष्यो बोले ।।३११।।

।। फेकीली मी वीट। पत्थर की नेणों। सोनें, नाणों, मातें। सरी एकी ।।३१२।।

।। 'सोनीयाचे दुःख। होई काई, गुरो! गर्भाद्रि हा पावो । स्वर्णरूपू ।।३१३।।

।। वृक्ष, वल्लरी त्या। पर्णो, पुष्पें, खोंडे। दगड, नी माती। स्वर्ण देखे ।।३१४।।

।। गोरक्ष किमया-। गिरी गर्भाद्रीसी । भानू कवी पाही । वर्णायाते ।।१५।।

।। देवां, साधु संता । भंडारें भरवी । षड्रसी जेववी । पक्कान्नांनीं ।।१६।।

।। गहीनी, मीनांसी । पाचारीले तेथु । प्रसादें भरीतु । किमयागारी ।।१७।।

卐 卐 卐 卐

## २४ समाधी-कबरी

।। उमानाथां हाती । गहीनीसी दीक्षा । देववी गोरक्षा । भद्रागीरी ।।१८।।

।। सुवर्णू पर्वतु । कुबेरासी देतु । इये पर्वतासी । आद्या नाथु ।।१९।।

।। आद्यानाथु राही । तैसा मच्छिंदरू । मढीं-मठीं राही । पाही पुढें ।।३२०।।

।। महि-मठी तैसा । जालंधरू नाथु । नागनाथु तेवी । वडिवानळी ।।२१।।

।। गोरक्षु गर्भाद्री । रेवणु विट्यांतु । येवोनी रहातु । मधूसह ।।२२।।

।। सर्वांनीं समाधी । येथें वरीयेली । शके दहाशती । भानू मती ।।२३।।

।। यावनी संस्कृती। कबरी त्या मानी । पीरू-रूपें तदा । समाधीसी ।।२४।।

।। जानपीर झाले । जालंधर नाथु । गैबी पीर तेंवी । गहीनी तो ।।२५।।

।। मायाबा मच्छिंद्रा । कान्होबा कानीफा । समाधी कबरी । बनविल्या।।२६।।

।। सटवी अटवी- । माजी रक्षिताती । दर्शनाते येती । यती योगी ।।२७।।२३

## २५ विक्रम भर्तृरी

।। गोरक्षाची खरी । किमयागीरी दूरी । भर्तृरी चरित्री। देखा पुन्हां ।।२८।।

।। पूर्वी एका काळी। कौलीकाचे मेळीं। झळाळी भर्तृरी। जन्मा आला ।।२९।।

।। तारा ध्रुवू-मीनू । नवा नारायण । येतां स्वर्गीहून । भूमी भागी ।।३३०।।

।। हरीणी पाजोनी । भर्तरीसी दूध । वर्षे पांच परी । वाचा-हीन ।।३१।।

।। अप्रबुद्ध बाळा । जैसिंगू नेतसे । काशी-वाशी-ईशें । संबोखीले ।।३२।।

।। जैसिंगू देवाज्ञें । स्वर्गवासी होतां । वाण्यासंगे जातां । होई बुध्द ।।३३।।

।। रानी राहोनींयां। वाणी कोल्ही यांची। भर्तरी जाणाया। शिकलासे।।३४।।२४

।। वाण्यांचा उदीम । उज्जैनीसी चाले। संगे त्यांच्या आले। भर्तृहरी ।।३५।।

।। कोल्हा-कुई बोले । तस्करें चाहूलें। जागें सर्वा करी। वाणीयांसी ।।३६।।

।। वाणीये पुसतां । भर्तृहरी बोले । 'कोल्होबांची भाषा । जाणीतली ।।३७।।

।। आणिक कोल्होबा । सांगती येताहे । रत्नें चतुर्धरी । राक्षसो तो ।।३८।।

।। 'त्यांतें जो मारीलू। राजा उज्जैनीसी। रत्नें माणकेसी । भूषवील ।।३९।।

।। विक्रमु द्वारांतु । वाणीयांचा दूतु । ऐके तो हे मातू । शूरशाली ।।३४०।।२५

卐 卐 卐 卐

## २६ विक्रमेतिहास

।। कुंभारू कुलालू। कोणी उज्जैनीसी। कन्या सत्यवती। स्नुषा झाली ।।४१।।

।। कुलालाचा दास। गर्दभू गंधर्वू। शापभ्रष्टा आसा। होय त्यासी ।।४२।।

।। गंधर्वे वरीले । राजयाच्या कन्ये । शापें मुक्ता होतां । पुत्रत्यांतें ।।४३।।
।। विक्रम तो जाणा । सत्यवती पुत्रू । गंधर्वाचा सुतू । कुंभा-गेही ।।४४।।
।। दुर्गाचा रक्षकू । क्रमी वृत्ति ऐसी । मारोनी राक्षसु । रत्नें आणी ।।४५।।
।। दुर्गाचिये द्वारी । हत्ती मालाधारी । विक्रमु वरीला । राज्यकर्ता ।।४६।।
।। विक्रमु कुलालु । गंधर्वाचा पुत्रू । भर्तरी रानीलु । भ्राता मानी ।।४७।।
।। वाडीयांत राजा । विक्रमु जो दूतु । मत्रीयांत शोभे । भर्तरी तो ।।४८।।
।। मंत्रियाची कन्या । भर्तरीची भार्या । पिंगला नामे या । शोभतसे ।।४९।।
।। भर्तरी विद्येसी । विक्रमु शौर्येसी । जनीं आदरेंसी । वागविती ।।५०।।
।। मेधावती कन्या । स्वयंवरु मांडी । राजयाचीं लेक । विक्रमासी ।।५१।।
।। राज्य वोपी राजा । जामातासी प्रेमे । भर्तरी तयाचा । मंत्री होई ।।५२।।

卐 卐 卐 卐

## २७ पिंगला सती

।। विक्रमू राजया । भर्तृहरी तेंवी । क्रिडनाची गोंवी । दोघांसीहि ।।५३।।
।। मृगया क्रीडना । भर्तृहरी जाई। शिणवीली काया । घोरा रानी ।।५४।।
।। तृषार्तू फिरे तो । राना वनांतूनी । जलावीणू मीनू । तळमळे ।।५५।।
।। दत्त गुरु त्यासी। रानी दिसूं लागे। 'तपस्येसी भागे । क्रीडा सोडी ।।५६।।
।। सांगे गुरु राणा । भर्तृहरी मना । नच कांहीं येना । जलावीणू ।।५७।।
।। आणा भाका घेई । 'बारा वरुषांनी । तपांसी येईनू । तुझ्या पायी' ।।५८।।
।। राज्यीं परतोनी । पिंगलेसी भेटे । दिनीं दिनीं तेथें प्रेमा दाटे ।।५९।।
।। फिरोनी निघाला। मृगया क्रीडना । मृगी थोरु घाला । घालीताहे ।।६०।।
।। माथा मुगुटीचा । रक्ती भिजवोनी । पिंगलेसी दूतू । धाडियेला ।।६१।।
।। पिंगलेसी वाटे । नाथावरी धाडी । मृत्यु पंथे पडे । सती जाई ।।६२।।
।। मस्करी कुस्करी। भर्तरीसी भोंवे। दुःखासी तयाच्या। पार नसे ।।६३।।
।। स्मशानी तो जाई। रक्षेपाशी बैसे। पिंगलेच्या ध्यानी। दुःखी कष्टी ।।६४।।

## २८ भर्तृहरी नाथ

।। स्मशानी धांवला । गोरखु बोधला । दत्त नाथें तेथें । पाठविला ।।६५।।
।। नाण्याचे मडके । घेवोनिया हात्ती । रंगांनी नटवी । नाना वर्णी ।।६६।।
।। भर्तरी समीपू । ठेंचा खाऊनिया । गोरक्षु मूर्च्छेनी । पडे तंव ।।६७।।
।। सांवरोनी पुन्हां। उठोनियां शोके । आकाशु फोडोनी । टाहो करी ।।६८।।
।। देखोनियां योगी। नोळखे गोरक्षु। विचारीता 'मूर्खा!। शोकी कां तूं? ।।६९।।
।। योगी त्यासी सांगे। 'फुटले मडकें । पिंगलेच्या सरी । प्रिय माझें ।।७०।।
।। उमगला राया। शोकू बुझाविला । गोरखु म्हणाला। पहा, राया! ।।७१।।
।। पहा या पिंगला। बोलावती तूज । 'राखिताती बूज । सदा तूझी' ।।७२।।
।। भर्तरी शरणू । नाथ-पंथीयांसी । दीक्षा तंव त्यासी । गोरक्षु दे ।।७३।।
।। भर्तरी लोहासी । देतां स्वर्ण-वर्णु । परीसू गोरक्षू । मालू गणी ।।७४।।२९

卐 卐 卐 卐

## २९ चौरंगीनाथ

।। कोण्हे एके गांवी । शशांगरु राया। तपें करी, काया। कृशांगारी ।।७५।।

।। कृष्णा तुंगभद्रा । तीहीसी मिळणी । तपें तेथें करी । रामेश्वरी ।।७६।।

।। लाभे त्यासी पुत्रु । नामें कृष्णांगरू । मदनाचा वर्णू । रूपू त्याचे ।।७७।।

।। रुपें तारुण्यानें । मुसमुस वधू । दृष्टी नारी जनी । नेघे कदा ।।७८।।

।। राया शशांगरा । शस्यू ते भार्या । एकाएकी आर्या । निवर्तली ।।७९।।

।। भुजावंती अन्या । स्वरुपाची खाणी । शशांगरा राणी । मिरविते ।।८०।।

।। भुजावंती माता । सापत्नता भावे । कृष्णांगरा पुत्रा । झळंबिते ।।८१।।

।। पितळेचे कानी । फुंकोनीयां राणी । कृष्णांगरा केले । शासनाते ।।८२।।

।। हस्तपाय त्याचे । चारी तोडूनीयां । चौरंगी टाकीला । सुवर्णाच्या ।।८३।।

।। कौंडिण्या पुरीची। ऐशी वार्ता होतां। तातें पुत्रा स्वतां। घातु केला ।।८४।।

।। मच्छिंद्रू गोरक्षु । दत्त दर्शनार्थी । मिरवीत येती । ग्रामातु या ।।८५।।

।। कृष्णांगारू तया । चौरंगीचा नेला । गव्हरी ठेवीला । तपस्येसी ।।८६।।
।। पर्वती चामुण्डा । फळें त्यासी देती । तपस्वी परी तो । उपवासी ।।८७।।
।। मुखी नाम जपे । नेत्र उर्ध्व दृष्टी । कंठी प्राण आले । भरोनियां ।।८८।।

卐 卐 卐 卐

## ३० काया - प्रवेश

।। दत्तात्रेय नाथु । मच्छिंदरू गोरक्षु । त्रयी चाले यात्री । प्रयागासी ।।८९।।
।। रायु तेथें एकू। कोंणी मृत झाला। शोकाकुली देखे। जनू सारे ।।९०।।
।। गोरक्षु बोलला । ताता!मच्छिंदरा । रायासी जीववा । संजीवनें ।।९१।।
।। मच्छिंदरे केला । कायेत्त प्रवेश । रायु तो स्मशानी । उभा राही ।।९२।।
।। रायासी जे कांता। नामें जे रेवती । झाली गर्भवती । कांही काळे।।९३।।
।। पर्वती गव्हरी । मच्छिंदरू कायु । रक्षूनि गोरक्षु । राहीयला ।।९४।।

।। त्रिविक्रमू राजा । रेवती त्या राणी । धर्मनाथा पुत्रा । प्रसवली ।।९५।।

।। कामाठी घेवोनी। गव्हरी जावोनी। देही तो शोधोनी। मच्छिंदरू ।।९६।।

।। तोडोनी देहातें। कोल्ही, कुत्री जेथे। मांसान्नात त्यातें। तोषविले ।।९७।।

।। सांबाल्यीशिवू । उमा कैलासासी । बोलावीती गणां । मच्छिंद्रार्थी ।।९८।।

।। हरी नारायणू । हरू नारायणू । एकीकृतू गणां । आज्ञापीती ।।९९।।

।। 'गण! कण करा। मातीचा चाकोरा। देही तो विकारा। मच्छिंदरू ।।४००।।

।। आज्ञा म्हणोनीयां। मच्छिंदरू देह। गणी तो शिवाच्या। जमा केला ।।४०१।।

।। वीरभद्रा हातीं । मच्छिंदरू देहू । संरक्षूना राही । कैलासीतो ।।४०२।। ३१

卐 卐 卐 卐

## ३१ माणीक अडभंग

।। ग्रामी भामापूरी । गोदा तीरावरी । माणीकु कृषीकू । गोरक्षासी ।।४०३।।

।। अन्नपाणी देई । गोरक्षु तोषला । वर मागे म्हणे । गोरक्षु त्या ।।४०४।।

।। माणिकु गोरक्षा। नाथा ह्मणे 'तूचि। 'मागें वर मातें। तदा नाथू ।।४०५।।
।। त्यांते म्हणे देई,। करू नको काई। मनाशी रुचे ते। तेंचि त्यागी ।।४०६।।
।। तापसी माणीकू । केली येणें रीति । कीर्तू त्याची होई । अलौकिकू।।४०७।।

卐 卐 卐 卐

## ३२ तप-फल

।। बद्री केदारासी । चौरंगी तपे तो । पाहुनी गोरक्षु । तया तोषे ।।४०८।।
।। नवीन तयासी । हस्तपाद येती । जपांती केवला । किमया होई ।।४०९।।

卐 卐 卐

## ३३ मच्छिंदर देह

प्रयागासी होता । शशांगरु देही । चौरंगी कुमारू । भेटे त्यासी ।।४१०।।

।। सिंहासनी स्थापी। स्वकीय तो पुत्रू। कृष्णांगरु ज्यातें। पूर्व नामू ।।११।।
।। आतां मच्छिंदरु। शशांगर देहो। त्यागी, परी त्यासी । ना स्वदेहो ।।१२।।
।। गोरक्षु झुंजला । वीरभद्रा गणां । मच्छिंदरु कर्दमा । आणीतला ।।१३।। ३३
।। वीरभद्रा देई । संजीवू गोरक्षु । शंकरासी तोषू । देई ऐसा ।।१४।।
।। मच्छिंदू गोरक्षु । अंडबंगु, धर्मू । चौघे नाथु जती । यात्री जाती ।।१५।।
।। माणीकू कृषीकू । अडदांड जाती । तपस्वी नामासी । अडबंगू ।।१६।।
।। प्रयागासी त्यासी । धर्मनाथु भेटे । घेवोनी सर्वातें । यात्रा चाले ।।१७।।

卐 卐 卐 卐

## ३४ रेवण नाथ

।। रेवा तीरी बाळ । वाळूमाजी मिळे । सहनु सारुकें । पाळीयेलें ।।१८।।
।। कृषीका ती विद्या। पितयानें एकू। दिली, परी त्यासी । अनुग्रहो- ।।१९।।

।। दत्तात्रेय गुरु। यांचा तो प्रसाद । सिध्दि वश त्यासी । तोचि छंद ।।४२०।।

।। प्राण्यां-जनां-ग्रामां । मिष्टान्नांनीं भोजी । दत्तात्रेयां कोठें । भिक्षान्नें जी।।२१।।

।। तदा दत्तनाथ। तपूं त्यासी दीले । ब्रह्मज्ञानी होई । रेवणू तो।।२२।।

।। विटें ग्रामामाजी । रेवणू राहीला । सप्त बालकांतें । सोडवीले ।।२३।।

।। यमपूरी तैसी । कैलासीहि जाई । आपूनीया आई । तोषवीली ।।२४।।

卐 卐 卐 卐

## वट सिध्द-नागनाथ

।। कोणी कोशधर्मा । वृक्षीं वटा तली । बाळातें पाहोनी । गेहीं नेतु।।२५।।

।। बाळ तो खेळतो । अन्न संतपर्णी । मिष्टान्नें लटकी । दानी शूर ।।२६।।

।। कोणी नारायणू । जन्मा आला योगी । आविर्होतृ नरू । रुपें येई।।२७।।

।। 'दत्तात्रेया नाथा । भेटवावें ताता'। विनवितो बाळ । वट-सिध्द ।।२८।।

।। पांचाळी शोधीतू । येई मातापूरी । तैसा कोल्हापूरी । काशींतहि ।।२९।।
।। पक्वान्नें मिष्टान्नें । सर्वा वाढीताहे । दत्त गुरु येतीं । भेटायातें ।।३०।।
।। नाथु तेथें येतां । भिक्षेचिया मिषे। पाय धरी, तोषें । अन्तरी तो ।।३१।।२६
।। उभय ते क्षेत्री । काशीपुरी येती । शिवासीही भेटी । तेथें दोघां ।।३२।।
।। तेथोनि यात्रेसी । भूमीवरी जाई । वडिवाळी राही । सर्वा क्षेमू ।।३३।।
।। मच्छिंद्र पारखी। येई तो या ग्रामी । विद्या शस्त्रें अस्त्रें । ओपी तया।।३४।।२७

卐 卐 卐 卐

## ३६ चर्पटी नाथ

।। सत्यश्रवा नामें। कोणी ऋषी राही । रानी देखे बाळू । दर्भामाजीं ।।३५।।
।। शंका मनी येई । भीति त्यासी घेरी । नारदांची स्वारी । येई तेथें।।३६।।
।। पुष्पे वर्षताती । बाळावरी देवू । नारदांचें हातीं । नेई बाळु ।।३७।।

।। पत्नींनें तयासी । वाढवीले सोई । विद्याभ्यासे त्यातें । ज्ञानी केलें ।।३८।।

।। चर्पटी हा नाथू । कथीयेलें नाम । नारदे तयासी । यात्री नेलें ।।३९।।

।। उपदेशा लाभे । ब्रम्हवाक्य त्यातें । जीव ब्रम्ह जाणा । योगी राजा।।४०।।

।। चरपटी यात्रा । संगे विष्णु शिव। दत्त निरंजनु । सर्व-स्थलीं ।।४१।।

।। व्यवहारी दक्ष । यजमानू-कृत्यी । दक्षिणेच्या पायी । कोपे त्याते ।।४२।।

।। पितयासी कोपे । कुलंबासी संगे । घेवोनी चा़लला । चौदा भूवीं ।।४३।।

।। केदारासी भेटी । मच्छिंद्रू दत्तांसी । अनुग्रही स्वयें । अनेकांसी ।।४४।। ३८

।। देवांसंगे युध्द । खेळे योगीराजा । इंद्रा शिवां सर्वा । पराभवीं ।।४५।।

卐 卐 卐 卐

## ३७ सोम-याग

।। इंद्रातें सांगे । बृहस्पती स्वयें । नाथां सर्वा आणी । स्वर्गामाजी ।।४६।।

।। सोम-याग करी । अग्रपूजा देई । मच्छिंद्रू नाथांसी । तोषवी तूं ।।४७।।

।। नाथ सारे येती । इंद्रातें कथीती । करूं यज्ञ प्रेमें । लंके माजी ।।४८।।

।। यज्ञ चालू होतां । मीनु नाथा विद्या । मच्छिंदरु देतां । इंद्रो घेई ।।४९।।

।। मोर रूपे पक्षी । इन्द्र विद्या घेई । क्षमा याची नाथा । विद्या-पायी।।५०।।

।। सोम याजी सारे । आपुलाल्या स्थली । पांगुनीया जाती । शुभो होतां।।५१।।

卐 卐 卐 卐

## ३८ सारांश

नारायणू सारे । नरु रूपें आले । करणीनें नरू । नारायणू ।।५२।।

नमुनेच्या तीरी । मच्छिंदरा जन्मू । भद्रागिरी वरी । समाधीत ।।५३।।

जालंधरू तेथें । जान पीरू होई । गहिनीहि तेथें । गैबी पीरू ।।५४।।

गोरक्षुहि तेथें । रेवणु विट्ठ्यासी । इतर रहाती । गुप्त वेषें ।।५५।।

वायु आकर्षणु । तोची प्राणायामु । विजयाचा मार्गू । देवांवरी ।।५६।।

।। देहो कर्दमाचा । गोळा चिखलाचा । सुवर्णु तयाचे । तपस्येनें ।।५७।।
।। देहाची कसोटी । मनाची पारखू । हीच ती किमया । मालू-साक्ष।।५८।।

## ३९ भूमिका

।। इच्छा भक्ति, आत्मशक्ति, मंत्री स्थिति, गुरु प्रसादू, ।।
।। ईश-कृपा, पंच महती, कार्यकर्ता विजयो यांनी ।।५९।।

## ४० फल-श्रुति

।। गोरक्षु सर्व किमयागारु, ग्रंथी गोवियेले साचारु ।।
।। हर्षतील सश्रध्द नरु, नाथ लीला अद्भुत ।।४६०।।

आतां कथीन फले सारी, सार रूपें इथें आली ।।

।। शत्रुनाश, समंध-बाधा, शत्रुमोहन, भूत, बाधा-शत्रुच्चाटण, ।।

।। अग्नि-पींडा, दारिद्र्योच्चाटण, कलह-पींडा, कपट, नाशन, ।।

।। रोग-पींडा, हस्ती पठणे-''लीलामृते'' ।।६१।।

।। धन, विद्या, विजय, पुत्र, कारामुक्ति, ।।

।। कलह-शांति, योगसाधन मोक्षही ।। ६२।।

।। ॐ नमो जी अवधूता । आद्य श्रीमच्छिंद्रनाथा ।

श्रीगुरुंचा प्रसाद होतां । सर्व कार्ये साधती ।।६३।।

नमुनि गोरक्षनाथासी । नित्य लक्षी उपासनेसी ।

आंस त्याची निश्चयेसी । पुरवी श्रीगुरु सर्वदा ।।६४।।

ऐका दोन मंत्रांची महती । अक्षरें अठरा एका असती ।

पहिला जो 'दिगंबरा' इत्यादि । दुसरा 'द्रां' दत्तात्रेय नमः ॥६५॥
अठरा अक्षरी मंत्राचा । जप बावीस सहस्त्रांचा ।
तर्पण नेम दशांशाचा । द्विशतवीस हवनार्थ ॥६६॥
दुसरा वज्रकवचांतील । अष्टोत्तरशत जो जपील ।
मंत्र कवचाविना निष्फळ । नित्य कवचाचा पाठ करा ॥६७॥
जो भक्त प्रतिदिवशी । वाची या लीलामृतासी ।
धाऊनि त्याच्या कार्यासी । अष्टसिद्धी पळताती ॥६८॥
नित्यनेम ज्याचा आहे । किमयागिरी काव्यप्रवाहे ।
नवनाथ लीलमृत हे । सर्वसिद्धी ओपीतसे ॥६९॥
जो कोणी भक्तश्रेष्ठ । लीलामृती एकनिष्ठ ।

६५- दिगम्बरा दिगम्बरा श्रीपादवल्लभ दिगम्बरा हा अठरा अक्षरांचा मन्त्र
६६ दशांश - दहावा भाग (या ओवीत बावीसशें असा अर्थ होतो)
६६ द्विशतवीस - दोनशेंवीस ६७ अष्टोत्तरशत - एकशेआठ
६९ ओपीतसें - देत असे (देईल)

नाथ त्याचे सर्व कष्ट । हरण करिती तात्काळ ॥४७०॥
धरुनिं कांहीं कामनेसी । वाचील काव्यप्रवाहासी ।
वर्षपर्यन्त त्या भक्तासी । नाथ आशीर्वाद लाभेल ॥७१॥
गुरुवारा शुभ पाहुनी । आरंभ करावा यामिनी ।
शब्द कांहीं पडतां कानी । निर्भय चित्ती वाचावें ॥७२॥
पाठाची जवं सिध्दी होई । ध्वनि 'अलक्ष'कानी येई ।
शुभाशुभ सांगती स्वप्नीं । नाथ वचन ऐकावें ॥७३॥
कार्यासाठीं निघे साधक । नाथां पुष्प वाहूनि एक ।
आमंत्रुनी जाईल देख । कार्य सफल होतसे ॥७४॥
जरी कांहीं चेटुक करणी । करील कुणी अदृश्यपणी ।
नाथकृपेनें त्याचीच झणी । पीडा परस्पर टळतसें ॥७५॥

७१ लाभेल - मिळेल ७२ यामिनी - रात्री ७३ ध्वनि अलक्ष -अलक्षनिरंजन असा शब्द

७६ आण - शपथ

कार्य कैसेही असो महान । दैवतां घाला नाथांची आण ।
आपुली वचनें आठवून । तात्काळ कार्यार्थ जातील ।।७६।।
कानीफ नाथ गोपीचंदनार्थ । तैसी दैवतें भक्तहितार्थ ।
कार्य साधावया समर्थ । वचनी नाथें गुंतविली ।।७७।।
या ग्रंथाचे पठण सर्वदा । करील त्याच्या सर्व आपदा ।
जाऊनि, त्या मिळती संपदा । अनुभवें सत्य कळेल ।। ४७८।।

## स मा प्त

७८ आपदा-दुःख, आपत्ती, संकटे. संपदा-सम्पत्ती, ऐश्वर्य.

卐 卐 卐 卐

## ।। श्रीनवनाथांची आरती ।।

जय जय नवनाथांचा । जय ज्ञानेशांचा । योगीजन नीरांजन । जय गर्जू गुरुंचा।। जय देवा जय देवा । जय जय नवनाथा । जय श्रीसांब सदाशिव । जय आज्ञा नाथा ।। जय जय ।।१।। जय श्रीदत्तानाथा । जय श्री रघुनाथा । जय नाथा मछिंद्रा । गुरु होसी इंद्रा ।। जय जय ।।२।। गोरक्षा तूं रक्षिसि । मोहातुनि गुरुसि । शिष्योत्तम तू होसी । जय तव श्रीनाथा ।।३।। मीना मारुनि जीवें । जीवन त्या दिधले । गुरुतें सावध केलें । मोह मुक्त केलें । ऐसा महिमा भूवरी। आहे नाथांचा ।।४।। मागू नाथापाशी । मुक्ति आम्हां द्यावी । जय नाथा, नवनाथा । आरती पुरवावी ।।५।। जय जय नवनाथांचा । जय ज्ञानेशांचा । योगीजन निरांजन । जय गर्जू गुरुंचा ।। जयदेवा ।।

卐 卐 卐 卐

# श्री नवनाथ नित्यपाठ

विघ्ननाथ श्रीगणेशातें । आद्यनाथ श्रीशंकराते ।। गुरू श्रीपाद श्री यतीते ।
वंदितो श्री रघुराजा ।।१।। नमूं आतां नवनाथां । जन्म अयोनिज त्या होता ।।
योगबल त्या दिले स्वतां। आद्यनाथे प्रत्यक्ष ।२। नाथनावे नवारंभक।
मछिंद्र, गोरक्ष, गहिनी प्रमूख।। जालंधर, कानिफ, रेवण देख।
मीन, नाग, चर्पटी।३। नवनाथ यति यात्रिक । योग मार्ग प्रचारक ।।
त्याग परहित मंत्रैक । गुरुभक्त ते निरंजन ।४। चिखल गोळा मानवदेह ।
जाणीव चित्कलेसह ।। ज्ञान विज्ञान साधन व्यूह । देह धरितीं नवनाथ ।५।
नवनाथा नमस्कारूं । अवतार कार्य त्यांचे स्मरूं ।। योग पदही स्वीकरूं ।
मागू तया दिव्य सिद्धि ।६। नाथ नारायण हे नऊ । अवतरती, बल त्यांते बहू।।
करिती दैवतेंहि जर्जरु । विश्वंभर त्या वश झाले ।७। वायुदेवांसि आकर्षिले ।
भैरवाग्नीस वश केले । सूर्यतापन सहन झाले । साह्य करिती वेताळहि ।८।
श्रीशिव, श्रीराम, श्रीदत्त । आदेशा लक्ष देती गुप्त ।। प्रकट दर्शन सदादेत ।

जयनाथ गाऊं नऊं ।९। त्याग आदेश ते देती । दीना अनाथां उपकारिती । धन धान्यादि संपदा किती । वितरती घरो घरीं ।१०। वश यांतें सकल शक्ति। राजशक्ति, नि देवभक्ति। कामिनी, नि गुरुभक्ति। कालशक्ति हि वश यांसीं।११। आदिशक्ति श्री भवानी ।ललिता,दुर्गा जी कुंडलिनी । योगिनी ती सद्यः प्रसादिनी। "इच्छिलें तें देतसे ।१२। जय जय श्री नवनाथ । बुध्दिचातुर्य, दे, साथ । मुखी नाम-जप सदा होत । प्रेमा हृदी भक्तांस्तव ।१३। यवन हिंदूसी एकता । गिरि कुहरी वास करितां ।अलख निरंजन बोध देतां। नाथ पंथा जय गाऊं।१४। कार्य केले सप्तशत । वर्षे, रक्षिले श्री, भक्त,। यज्ञ मार्गे, दाने देत । इंद्रराजहि दास केला ।१५। धरूं ध्यानी नाथां सदा । स्तवूं त्यांसीच सर्वदा । याचूं एकचि संपदा । भार आपदा करां दूरी ।१६। योग विद्या आम्हां द्यावो । कौशल्य कृति, हाती यावी ।। हीच सेवा अखंड व्हावी । सनाथ नारायणा ! करा आम्हां ।१७। आदिनाथ श्री उमाकान्त । गुप्त राहती स्वर्ण-गिरींत । 'म्हातारदेव' प्रसिध्द होत । नमन देवा ! उमाकान्ता! ।१८। गर्भगिरी जो गिरी सुवर्ण । कानीफ येथेंचि

राही पूर्ण । मच्छींद्र-बायला गौरवर्ण । मढीस्थानी दक्षिणेसी।१९। जालंदर जे जानपीर । वसले पूर्वेस या गिरीवर । समीप पाही नृसिंहपूर । गोरक्ष तेथें राहिले।२०। गर्भाद्रीवरीवाम तीर्थी । गोरक्षांची झाली वस्ती । नृसिंहपुर त्याची ख्याती । जाहली असे आजकी ।२१। वडवानळीस नागनाथ । विटें गांवीं रेवणनाथ। शिष्य होय गहिनीनाथ । गैबी पीर, गोरक्षाचा ।२२। मीन नाथ राही स्वर्गी । चर्पटीनाथ यात्रा मार्गी । चौरंगी-अडबंगी संगें दुर्गी । फिरती भर्तरी पाताळी ।२३। आठवितां नवनाथा । भूतें, पिशाचें, काय कथा । देवता, सिध्दि, येती हाता । जपें केवलें, भस्म मंत्रें ।२४। स्मरणे यशे, धने, मान । भक्तांसि काही नसे वाण । इच्छिले पावती दीनजन । शरण नाथांसी येता क्षणी।२५।

卐 卐 卐 卐

# श्रीगुरुपादुकाष्टक

ज्या संगतीनेच विराग झाला । मनोदरीचा जडभास गेला । साक्षात् परात्मा मज भेटवीला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।१।। सद्योगपंथें घरिं आणियेले । अंगेच मातें परब्रह्म केलें । प्रचंड तो बोधरवी उदेला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।२।।चराचरी व्यापकता जयाची । अखंड भेटीं मजला तयाची । परंपदी संगम पूर्ण झाला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।३।। जो सर्वदा गुप्त जनांत वागे । प्रसन्न भक्तां निजबोध सांगे । सध्दक्तिभावाकरितां भुकेला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।४।।अनंत माझे अपराध कोटीं । नाणी मनी घालुनि सर्व पोटीं प्रबोध करित्तां श्रम फार झाला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।५।।कांहीं मला सेवनही न झाले । तथापि तेणें मज उद्धरीले । आतां तरी अर्पिन प्राण त्याला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।६।। माझा अहंभाव वसे शरीरीं । तथापि तो सद्गुरु अंगिकारी । नाहीं मनीं अल्पविकार ज्याला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।७।।आतां कसा मी उपकार फेडूं । हा देह ओवाळूनि दूर सोडूं । म्यां एकभावें प्रणिपात केला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।८।।जया वानिता वानिता वेदवाणी । म्हणें 'नेति नेति' ती लाजे दुरुनी ।नव्हे अंत ना पार ज्याच्या रुपाला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ।।९।। जो साधुचा अंकित जीव झाला । त्याचा असे भार निरंजनाला । नारायणाचा भ्रम दूर केला । विसरु कसा मी गुरुपादुकाला ।।१०।।मालाकमण्डलुरधः करपद्मयुग्मे मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशुले । यस्यस्त ऊर्ध्वकरयोः शुभशङ्खचक्रे वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ।।

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरवे नमः ॥ ध्यानम् ॥ जटाधरं पांडुरंगं शूलहस्तं कृपानिधिम् । सर्वरोगहरं देव दत्तात्रेयमहं भजे ॥ १ ॥अस्यश्रीदत्तात्रेयस्तोत्रमंत्रस्य भगवान्नारद ऋषिः। अनुष्टुप् छंदः । श्रीदत्तः परमात्मा देवता ॥ श्रीदत्तप्रीत्यर्थे जपे विनियोगः ॥ जगदुत्पत्तिकर्त्रे च स्थितिसंहारहेतवे । भवपाशविमुक्ताय दत्तात्रेय नमोऽस्तुते ॥ १ ॥ जराजन्मविनाशाय देहशुद्धिकराय च ।दिगंबर दयामूर्ते दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ २ ॥ कर्पूरकांतिदेहाय ब्रह्ममूर्तिधराय च । वेदशास्त्रपरिज्ञायदत्तात्रेय नमो० ॥ ३ ॥ ऱ्हस्वदीर्घकृशस्थूलनामगोत्रविवर्जित । पंचभूतैकदीप्ताय दत्तात्रेय नमो० ॥ ४ ॥ यज्ञभोक्त्रे च यज्ञाय यज्ञरूपधराय च । यज्ञप्रियायसिद्धाय दत्तात्रेय नमो० ॥ ५ ॥ आदौ ब्रह्मा मध्ये विष्णुरंते देवः सदाशिवः। मूर्तित्रयस्वरूपाय दत्तात्रेय नमो० ॥ ६ ॥ भोगालयाय भोगाय योगयोग्याय धारिणे । जितेंद्रिय जितज्ञाय दत्तात्रेय नमो० ॥ ७ ॥ दिगंबराय दिव्याय दिव्यरूपधराय च । सदोदितपरब्रह्म दत्तात्रेय नमो० ॥ ८ ॥ जंबुद्वीपे महाक्षेत्रे मातापुरनिवासिने । जयमानोऽसित्वं देव दत्तात्रेय नमो० ॥ ९ ॥ भिक्षाटनं गृहे ग्रामे पात्रं हेममयं करे । नानास्वादमयी भिक्षा दत्तात्रेय नमो० ॥ १० ॥ ब्रह्मज्ञानमयी मुद्रा वस्त्रे चाकाशभूतले। प्रज्ञानघनबोधाय दत्तात्रेय नमो० ॥ ११ ॥ अवधूत सदानंद परब्रम्हस्वरूपिणे । विदेहदेहरूपाय दत्तात्रेय नमो० ॥ १२ ॥ सत्यरूप सदाचार सत्यधर्मपरायण । सत्याश्रय परोक्षाय दत्तात्रेय नमो० ॥ १३ ॥ शूलहस्त गदापाणे वनमालासुकंधर । यज्ञसूत्रधर ब्रम्हन दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १४ ॥ क्षराक्षरस्वरूपाय परात्परतराय च । दत्तमुक्तिपरस्तोत्र दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १५ ॥ दत्तविद्याढ्य लक्ष्मीश दत्तस्वात्मस्वरूपिणे गुणनिर्गुणरूपायदत्तात्रेय नमो० ॥ १६ ॥ शत्रुनाशकरं स्तोत्रं ज्ञानविज्ञानदायकम्। सर्वपापं शमं याति दत्तात्रेय नमो० ॥ १७ ॥ इदं स्तोत्रं महद्दिव्यं दत्तप्रत्यक्षकारकम् । दत्तात्रेयप्रसादाच्च नारदेन प्रकीर्तितम् ॥ १८ ॥ ॥ इति श्रीदत्तात्रेयस्तोत्रं संपूर्णम् ॥

## श्रीदत्ताची आरती १

त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा । त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा । नेति नेति शब्द नये अनुमाना । सुरवरमुनिजन योगी समाधि न ये ध्याना ।।१।। जयदेव जयदेव जय श्रीगुरुदत्ता । आरती ओवाळितां हरली भवचिंता ।।धृ।। सबाह्य अभ्यंतरी तूं एक दत्त । अभाग्यासी कैची कळेल ही मात। पराही परतली तेथे कैचा हा हेत । जन्ममरणाचा पुरलासे अंत ।।जय०।।२।। दत्त येवोनीया उभा ठाकला । सद्भावे साष्टांगे प्रणिपात केला । प्रसन्न होऊनी आशिर्वाद दिधला । जन्ममरणाचा फेरा चुकविला ।।जय०।।३।। दत्त दत्त ऐसे लागलें ध्यान । हारपलें मन झालें उन्मन । मी-तूं पणाची झाली बोळवण । एका जनार्दनी श्रीदत्तध्यान ।।जय०।।४।।

## श्रीदत्ताचीची आरती २

दत्तात्रय अवधूत जनार्दन स्वामी एकनाथ । जनार्दनस्वामी एकनाथ । ही नामें जे जपती त्यांसी साधे निजस्वार्थ ।।१।।धृ०।। अनन्यभावे अखंड जे कां भजती निजभक्त। जे कां भजती निजभक्त । भक्ति देऊनी दत्त तयांसी करी सहज मुक्त ।। दत्ता०।।२।। ठाकुरदासा अनाथ जाणुनि करितो सनाथ । जाणुनि करितो सनाथ । एकपणे विनटला दावी सद्गुरु एकनाथ । दत्तात्रय अवधूत जनार्दन० ।।३।।

॥ श्री ॥

नवग्रहदोष परिहारासाठी यंत्र

| बुध | शुक्र | सोम |
|---|---|---|
| गुरु | रवि | मंगळ |
| राहू | शनि | केतू |

अहःसुते सव्यं तव नयनमर्कात्मकतया
त्रियामां वामं ते सृजति रजनीनायक तया ।
तृतीया ते दृष्टिर्दरदलित हेमाम्बुजरुचिः
समाधत्ते संध्यां दिवस निशयोरन्तरचरीम् ॥

पिवळ्या वस्त्रावर हे यंत्र काढावे व या श्लोकाचा २९ दिवस दर दिवशी एक सहस्त्र प्रमाणे जप करून केळी आणि चित्रान्नाचा नैवेद्य समर्पण करावा म्हणजे ग्रह पीडा निवारण होते.